**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या मोटार वाहन विभागातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीडी-०१२२/ प्र.क्र.०५/ परिवहन-४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०७ जानेवारी, २०२२.

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/ वित्तीय सुधारणा, दि.२०.०२.२०१६.

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०९२१/प्र.क्र.४३/सीपीटीपी, दि.२२.१०.२०२१.

४) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र.३७/ सीपीटीपी-ब, दि.२४.१२.२०२१.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील उमेदवारांना यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील उमेदवारांना वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.४ वरील आदेशान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा २०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या उमेदवारांना एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रम-७ साठी प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती दिली आहे. त्यानुषंगाने मोटार वाहन विभागातील सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब या संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा २०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रम ७ साठी प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती दिलेल्या उमेदवारांसाठी प्रशिक्षण पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी (दोन वर्ष) अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा मुख्य परीक्षा-२०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रम-७ साठी प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती दिलेल्या मोटार वाहन विभागातील सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब वेतनश्रेणी एस-१६ (४४,९००-१,४२,४००) या संवर्गातील एकूण ०२ अधिसंख्य पदे सदर उमेदवारांच्या प्रशिक्षण सुरु होण्याच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या कालावधीकरीता निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पदे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. उपरोक्त प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रत्यक्ष उपस्थित उमेदवारांच्या संख्येनुसार वेतनापोटी अग्रिम निधी प्रशिक्षण संस्थेला उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेल्या निदेशानुसार करावी. तसेच व्यावसायिक खातेनिहाय प्रशिक्षण कालावधीत सदर निधी संबंधित उमेदवाराला अदा करण्याची अन्य व्यवस्था देखील त्यांनी करावी.

४. संबंधित अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च टाकून तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वित्त विभागाने संदर्भाधीन दि.२०.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१०७१५४९३१७६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2022.01.07 15:50:00 +05'30'

**(राजेंद्र होळकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२, (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /बुलढाणा.
७. कार्यासन क्र. व्यय-८ व वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४००१०.
९. कक्ष अधिकारी (सीपीटीपी-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती.